**अर्थ व सांख्यिकी संचालनालयातील “संशोधन अधिकारी / सांख्यिकी अधिकारी, गट-ब (राजपत्रित) " संवर्गातील अधिकाऱ्यांच्या बदल्यांबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन आदेश क्रमांकः बदली-१२२२/प्र.क्र.४/का.१४२७**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
विस्तार इमारत, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक:-६/३/२०२३

**शासन आदेश :-**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ चे कलम ४(४) (दोन) व ४(५) मधील तरतुदीनुसार अर्थ व सांख्यिकी संचालनालयातील “संशोधन अधिकारी/सांख्यिकी अधिकारी, गट-ब (राजपत्रित)" या संवर्गातील खाली नमूद अधिकाऱ्यांची सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने बदली करण्यात येत असून त्यांची पदस्थापना खालील तक्त्यातील स्तंभ क्रमांक ३ मध्ये दर्शविलेल्या पदावर करण्यात येत आहे :-

| अ.क्र. | अधिकाऱ्यांचे नाव, पदनाम व सध्याचे कार्यालय | बदलीनंतरचे पदनाम व कार्यालय |
|---|---|---|
| (१) | (२) | (३) |
| १ | **श्रीमती पूजा संदीप पाटील,<br>सहायक जिल्हा नियोजन अधिकारी (मानव विकास),<br>जिल्हा मानव विकास समिती,<br>जिल्हाधिकारी कार्यालय, गोंदिया** | **सहायक जिल्हा नियोजन अधिकारी,<br>जिल्हा नियोजन समिती,<br>जिल्हाधिकारी कार्यालय, सांगली** |

२. महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ मधील नियमानुसार दिलेल्या पदग्रहण अवधीतच, बदली झालेल्या अधिकाऱ्याने बदलीच्या ठिकाणी रुजू होण्याची दक्षता घ्यावी. अन्यथा या पदग्रहण अवधीत बदलीच्या पदावर रुजू न झाल्यास, त्यांचा अनुपस्थितीचा कालावधी हा अकार्यदिन (Dies Non) म्हणून गणला जाईल.

३. महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ मधील नियम २३ च्या तरतूदी लक्षात घेता, त्यांनी पदस्थापनेत बदल करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील.

४. या शासन आदेशान्वये श्रीमती पूजा संदीप पाटील, सहायक जिल्हा नियोजन अधिकारी (मानव विकास), जिल्हा मानव विकास समिती, जिल्हाधिकारी कार्यालय, गोंदिया यांची बदली प्रशासकीय कारणास्तव करण्यात येत असल्याने त्यांना नियमानुसार अनुज्ञेय असणारा पदग्रहण अवधी, प्रवास भत्ता व दैनिक भत्ता देय राहील. तसेच या शासन आदेशान्वये श्रीमती पूजा संदीप पाटील यांना या आदेशाच्या दिनांकापासून कार्यमुक्त करण्यात येत आहे. श्रीमती पूजा संदीप पाटील यांनी पदभार सोडल्याचा तसेच स्वीकारल्याचा दिनांक त्वरीत अवर सचिव, नियोजन विभाग यांना balaso.gaikwad@nic.in या ई-मेल पत्त्यावर तसेच संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई यांना कळवावा.

५. महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर सदर शासन आदेश उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेताक २०२३०३०६१७००१७९११६ असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

DEEPAK SHIVAJIRAO DESAI

Digitally signed by DEEPAK SHIVAJIRAO DESAI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT, 2.5.4.20=4d11b2ee4dfa01facc6e58028a3bde93d4ac81d87ed6247ca0fb3a827602426f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F3A85577333780DB2D347FAB235605A8C51E9CF8DC3339F64ABA61827C8C000D, cn=DEEPAK SHIVAJIRAO DESAI
Date: 2023.03.06 17:05:25 +05'30'

**( दि. शि. देसाई )**
**सहसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

संबंधित अधिकारी (मार्फत: अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई)

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा.उप मुख्यमंत्री (नियोजन) यांचे सह सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा.विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र राज्य विधानसभा/ विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई.
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई
५. महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
६. संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई.
७. सहसचिव/उपसचिव/विशेष कार्य अधिकारी (सर्व), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
८. सहसंचालक, प्रादेशिक कार्यालय, अर्थ व सांख्यिकी संचालनालय (सर्व)
९. उपायुक्त (नियोजन), विभागीय आयुक्त कार्यालये (सर्व)
१०. उपसंचालक (प्रशासन), अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई.
११. जिल्हा कोषागार अधिकारी, गोंदिया/सांगली.
१२. जिल्हाधिकारी, गोंदिया/सांगली.
१३. जिल्हा मानव विकास समिती, जिल्हाधिकारी कार्यालय, गोंदिया.
१४. जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, सांगली.
१५. जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, गोंदिया.
१६. श्रीमती पूजा संदीप पाटील, सहायक जिल्हा नियोजन अधिकारी (मानव विकास), जिल्हा मानव विकास समिती, जिल्हाधिकारी कार्यालय, गोंदिया.
१७. अपर मुख्य सचिव (नियोजन विभाग) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१८. निवडनस्ती.